महाराष्ट्र विकास सेवा गट -अ साठी ३४ व महाराष्ट्र विकास सेवा गट-ब साठी २ अशी एकुण ३६ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.मविसे १० /२०१०/प्र.क्र.२४७/आस्था-३,
मंत्रालय मुंबई ४०००३२
दि.४ ऑक्टोबर, २०१०

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांच्या नेमणूका करण्याकरीता महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गाची ३४ अधिसंख्य पदे (वेतनश्रेणी रुपये १५६०० ते ३९१०० + ग्रेड वेतन रुपये ५४००+ इतर भत्ते) आणि महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या संवर्गाची २ अधिसंख्य पदे (वेतनश्रेणी रुपये ९३०० ते ३४८०० + ग्रेड वेतन रुपये ४४००+ इतर भत्ते) दिनांक १.१०.२०१० पासून १० महिन्याच्या कालावधीकरीता निर्माण करण्याकरीता शासन मंजुरी देत आहे. संबंधित परिविक्षाधिन अधिका-यांच्या नियुक्ती संबंधीचे आदेश स्वतंत्ररित्या काढण्यात येतील.

२. महाराष्ट्र विकास सेवा गट-अ व गट-ब च्या वरील ३६ परिविक्षाधीन पदांवरील दिनांक १.१०.२०१० ते ३१.७.२०११ या कालावधीचा खर्च आगामी हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीव्दारे उपलब्ध करुन देण्यात येणा-या निधी मधुन " २०५३- जिल्हा प्रशासन, ०९३- जिल्हा आस्थापना(३) प्रकल्प गट मुख्यालय, गट विकास अधिकारी (राज्यक्षेत्र) (२०५३०७०७) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांकः ४०३/ वित्तिय सुधारणा-१ दि.१५.९.२०१० अन्वये उच्चस्तरीय सचिव समितीच्या चक्रीय पध्दतीने प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१००४१५४७४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

(सरिता बांदेकर-देशमुख)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद सर्व

४. सर्व कोषागार अधिकारी
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
७. मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा नवी मुंबई
८. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती व नागपूर
९. वित्त विभाग (अर्थ संकल्प ३,१६ व व्यय-१५) वित्त विभाग मंत्रालय मुंबई
१०. कार्यासन क्र.वित्त-१, वित्त-९ ग्राम विकास व जल संधारण विभाग मंत्रालय मुंबई
११. निवड नस्ती (आस्था-३) ग्राम विकास व जल संधारण विभाग मंत्रालय मुंबई